**कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्थेतील कामगार संघटना व औद्योगिक संबंध या पदविका अभ्यासक्रमातील एका विद्यार्थ्याकरीता मास्टर ऑफ लेबर स्टडीज (एम.एल.एस.) या अभ्यासक्रमास एका अतिरिक्त जागेसाठी थेट प्रवेश प्रक्रिया राबविण्याच्या कार्यपध्दतीत बदल करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन शुध्दीपत्र क्र.एमएलआय- ०७०८ /प्र.क्र.४४ /कामगार-६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ ऑगस्ट, २०१८

वाचा: १. प्रबंधक, महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, परेल, मुंबई यांचे पत्र क्र.मश्रविसं/३५०१, दि.२७/०६/२००८.
२. शासन निर्णय क्र.एमएलआय-०७०८/प्र.क्र.४४/कामगार-६ दि.१७ जुलै,२००८.
३. संचालक, कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, परेल, मुंबई यांचे पत्र क्र.मश्रविसं/ २०८६,दि. १९/०७/२०१८

प्रस्तावना :

कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्थेमध्ये “कामगार संघटना व औद्योगिक संबंध” हा ९ महिने कालावधीचा पूर्णवेळ पदविका अभ्यासक्रम चालविण्यात येतो. तसेच संस्थेतील मास्टर ऑफ लेबर स्टडीज (एमएलएस) हा दोन वर्षाचा पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम मुंबई विद्यापीठाशी संलग्न आहे. या पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाकरीता संस्थेद्वारे राज्यस्तरीय प्रवेश परीक्षेचे आयोजन केले जाते. सदर प्रवेश परीक्षेतील गुणवत्तेनुसार एम.एल.एस. भाग-१ च्या प्रवेशाकरीता एकुण ५२ विद्यार्थ्यांची निवड करण्यात येते. याशिवाय “कामगार संघटना व औद्योगिक संबंध” या पदविका अभ्यासक्रमाच्या विद्यार्थ्यांपैकी प्रथम श्रेणीत प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण होणा-या एका विद्यार्थ्यांस प्रवेश प्रक्रियेशिवाय थेट प्रवेश देण्याची तरतूद संदर्भाधीन अ .क्र.२ येथील शासन निर्णय क्र.एमएलआय-०७०८/प्र.क्र.४४/कामगार-६ दि.१७ जुलै,२००८ नुसार आहे.

कामगार संघटना व औद्योगिक संबंध॰ या पदविका अभ्यासक्रमात प्रवेश घेणारे बहुतांश उमेदवार हे विविध आस्थापनांमध्ये कर्मचारी म्हणुन कार्यरत असतात. त्यांना केवळ ९ महिन्याच्या कालावधीसाठी व्यवस्थापनाने कार्यमुक्त केलेले असते व कामगार संघटनांचे ते सक्रिय कार्यकर्ते असतात. अशा उमेदवारांमधुन प्रथम श्रेणीत प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण झालेला उमेदवार हा एम.एल.एस. या दोन वर्ष पूर्णवेळ पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाला प्रवेश घेत नाही. परिणामी ही एक जागा रिक्त रहाते.

सदर जागा रिक्त राहु नये तसेच प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्याला उच्च शिक्षणाची संधी मिळावी यासाठी प्रथम श्रेणीत प्रथम क्रमांकाने उत्तीर्ण होणा-या विद्यार्थ्यांने एम.एल.एस. अभ्यासक्रमाला प्रवेश घेतला नाही तर ती संधी प्रथम श्रेणीत द्वितीय क्रमांकाने उत्तीर्ण होणा-या

विद्यार्थ्याला दिली जावी, जर द्वितीय क्रमांकाच्या विद्यार्थ्याने प्रवेश घेतला नाही तर ती संधी प्रथम श्रेणीत तृतीय क्रमांकाने उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्याला देण्यात यावी. याप्रमाणे पुढे ही प्रक्रिया जागा भरली जाईपर्यंत राबविली जावी. सदर विद्यार्थ्याला देखील प्रथम श्रेणीत उत्तीर्ण असणे आणि मुंबई विद्यापीठाच्या पात्रतेसंबंधीच्या अन्य निकषांची पुर्तता करणे आवश्यक राहणार आहे. या अनुषंगाने मागील लगतच्या “कामगार संघटना व औद्योगिक संबंध” या पदविका अभ्यासक्रमात प्रथम श्रेणीत उत्तीर्ण होणा-या एका विद्यार्थ्याला एम.एल.एस. भाग-१ च्या अभ्यासक्रमाला गुणानुक्रमे संधी देऊन चालु शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासुन सदर जागा भरण्यास मंजुरी द्यावी असा प्रस्ताव कै.नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्थेने संदर्भाधीन अनुक्रमांक ३ येथील पत्रान्वये सादर केला असुन, त्यास अनुसरुन दि.१७ जुलै,२००८ रोजी निर्गमित केलेल्या शासन निर्णयात सुधारणा करण्याकरीता पुढील प्रमाणे शुध्दीपत्र निर्गमित करण्यात येत आहे.

**शुध्दीपत्र :-**

अ.क्र.२ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार “कामगार संघटना व औद्योगिक संबंध” या ९ महिने कालावधीच्या पूर्णवेळ पदविका अभ्यासक्रमात लगतच्या मागील वर्षात प्रथम श्रेणीत उत्तीर्ण होणा-या विद्यार्थ्याला एम.एल.एस. भाग-एक च्या अभ्यासक्रमासाठी प्रवेश परीक्षेशिवाय १ अतिरिक्त जागा चालु शैक्षणिक वर्ष २०१८-१९ पासुन गुणानुक्रमे दिली जाईल. तथापि सदर विद्यार्थ्याने एम.एल.एस. भाग-१ च्या अभ्यासक्रमाला जर प्रवेश घेतला नाही तर ती संधी प्रथम श्रेणीत द्वितीय क्रमांकाने उत्तीर्ण होणा-या विद्यार्थ्याला दिली जाईल, जर द्वितीय क्रमांकाच्या विद्यार्थ्याने प्रवेश घेतला नाही तर ती संधी प्रथम श्रेणीत तृतीय क्रमांकाने उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्याला दिली जाईल. जर सदर विद्यार्थ्याने प्रवेश घेतला नाही तर पुढे ही प्रक्रिया जागा भरली जाईपर्यंत गुणानुक्रमे राबविली जाईल. सदर विद्यार्थी हा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण असणे आवश्यक आहे, तसेच त्यांनी मुंबई विद्यापीठाच्या पात्रतेसंबंधी अन्य निकष व प्रवेशासंबंधीच्या इतर अटींची (प्रवेश प्रक्रियेशिवाय) पुर्तता करणे आवश्यक राहील. सदर कार्यपध्दती तात्काळ अंमलात येईल.

सदर शासन शुध्दीपत्र www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१८०८२४१६२९३३७०१० असा आहे. हे शासन शुध्दीपत्र डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Shashank M. Sathe
Date: 2018.08.24 16:32:52 +05'30'

(श.मा.साठे)
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा. मंत्री (कामगार),
२. मा. राज्यमंत्री (कामगार),
३. प्रधान सचिव (कामगार) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,

४. संचालक, महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, परेल, मुंबई,
५. प्रबंधक, महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, परेल, मुंबई,
६. महालेखापाल-१ ( लेखापरीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९. उप सचिव (कामगार-६), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.निवड नस्ती ( कामगार-६)